**भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शाळेस सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षाकरीता वाढीव विद्यार्थी प्रवेशास मान्यता देणेबाबत.**
**बाळकृष्ण सेवाभावी संस्था, वाडी तुळजापूर, ता. वसमत जि. हिंगोली संचालित हायटेक प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, एरंडेश्वर (झीरो फाटा), ता. पुर्णा, जि. परभणी**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: धइशाप्र-२०२३/प्र.क्र.९२/योजना-२**
३ रा मजला,नवीन प्रशासन भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : १२ ऑगस्ट, २०२४

**वाचा :** १) शासन निर्णय, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, क्र. धइशाप्र- २०१९/ प्र.क्र.७२/शिक्षण, दिनांक ४/९/२०१९.
२) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग,क्र. धसशा-२०२१/प्र.क्र.७३(११)/धसयो, दि.२९/९/२०२१
३) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग,क्र. धइशाप्र-२०२३/प्र.क्र.९२/योजना-२ दि.२९/३/२०२३
४) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र. धइशाप्र-२०२१/प्र.क्र.९५/योजना-२, दि.५/३/२०२४
५) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग,क्र. धइशाप्र-२०२३/प्र.क्र.९२/योजना-२ दि.१५/३/२०२४
६) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग,क्र. धइशाप्र-२०२३/प्र.क्र.३३८/योजना-२ दि.१३/६/२०२४
७)संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, म.रा.,पुणे यांचे पत्र क्र.संइमावबकपुणे/ धइंशा/वाढीव विद्यार्थी मान्यता/२०२४-२५/पुणे/२५१५, दि. २६/७/२०२४

**प्रस्तावना : -**

भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबतचा निर्णय संदर्भ क्र. १ येथे नमूद दि. ४/९/२०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला असुन सदर योजनेंतर्गत निश्चित केलेली दरवर्षी ५५०० विद्यार्थी संख्या वाढवून ती दरवर्षी १०००० करण्यास अतिरिक्त निकषांच्या अधिन राहून संदर्भाधिन क्र.४ येथे नमूद दि. ५.३.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदरहू योजनेंतर्गत संदर्भाधिन क्र. २ येथे नमूद शासन निर्णयान्वये, बाळकृष्ण सेवाभावी संस्था, वाडी तुळजापूर, ता. वसमत जि. हिंगोली संचालित हायटेक प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, एरंडेश्वर (झीरो फाटा), ता. पुर्णा, जि. परभणी या शाळेची निवड करण्यात आली असुन सदर शाळेस संबंधित शासन निर्णयांतील अटी-शर्तींच्या अधिन राहून संदर्भाधिन क्र.२,३ व ५ येथे नमूद शासन निर्णयान्वये धनगर समाजातील एकूण २५० विद्यार्थी प्रवेशित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, म.रा., पुणे यांनी संदर्भाधिन क्र. ७ येथे नमूद पत्रांन्वये, सदरहू शाळेकडून संबंधित शासन निर्णय, दि.४/९/२०१९ मधील निकषांची तसेच शासन निर्णय, दि.५/३/२०२४ मधील

अतिरिक्त निकषांची पूर्तता होत असल्याच्या अभिप्रायासह, सदरहू शाळेला शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करीता धनगर समाजातील वाढीव विद्यार्थी प्रवेशित करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव विहित प्रपत्रांसह (सन २०२४-२५ करीता शाळेला प्राप्त गुणांकन ९०) शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने बाळकृष्ण सेवाभावी संस्था, वाडी तुळजापूर, ता. वसमत जि. हिंगोली संचालित हायटेक प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, एरंडेश्वर (झीरो फाटा), ता. पुर्णा, जि. परभणी या शाळेमध्ये सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षाकरीता भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील १०० वाढीव विद्यार्थी प्रवेशित करण्यास संबंधित शासन निर्णयातील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे' या योजनेंतर्गत संदर्भाधिन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये निवड करण्यात आलेल्या बाळकृष्ण सेवाभावी संस्था, वाडी तुळजापूर, ता. वसमत जि. हिंगोली संचालित हायटेक प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, एरंडेश्वर (झीरो फाटा), ता. पुर्णा, जि. परभणी या शाळेला खालील तक्त्यात नमूदप्रमाणे सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षाकरीता धनगर समाजातील १०० वाढीव विद्यार्थ्यांना प्रवेशित करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| संस्थेचे नाव | शाळेचे नाव | सदर शाळेला यापुर्वी मंजूर करण्यात आलेली विद्यार्थी संख्या | शाळेला शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करीता प्राप्त गुणांकन | प्रस्तुत शासन निर्णयान्वये सदरहू शाळेला सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षाकरीता मान्यता दिलेली वाढीव विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|---|
| बाळकृष्ण सेवाभावी संस्था, वाडी तुळजापूर, ता. वसमत जि. हिंगोली | हायटेक प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, एरंडेश्वर (झीरो फाटा), ता. पुर्णा, जि. परभणी | एकूण —२५० (शासन निर्णय, दि.२९/९/२०२१ अन्वये १००) (शासन निर्णय दि.२९.३.२०२३ अन्वये-१००) (शासन निर्णय, दि.१५/३/२०२४ अन्वये ५०) | ९० | १०० (एकूण मान्य विद्यार्थी संख्या ३५०) |

१. नामांकित शाळेत प्रवेश देताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे :-

१) संबंधित संस्था/शाळेस संदर्भाधिन शासन निर्णय, दिनांक ४/९/२०१९ मधील निकषांची तसेच शासन निर्णय, दि.५/३/२०२४ मधील अतिरिक्त निकषांची, अटी,शर्तीची पूर्तता करणे आवश्यक राहील. संबंधित संस्था/शाळेकडून संबंधित शासन निर्णयातील निकषांची, अटी शर्तीची पूर्तता होत असल्याची खातरजमा करुन संबंधित सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी विद्यार्थी वाटपाबाबत पुढील योग्य ती कार्यवाही करावी.

२) संदर्भाधिन शासन निर्णय, दिनांक ४/९/२०१९ मधील प्रपत्र-अ (२) (१) वसतिगृहविषयक अनिवार्य निकषामधील अ.क्र. १ प्रमाणे, संबंधित शाळेमध्ये विद्यार्थी व विद्यार्थीनींसाठी निवासाची व्यवस्था स्वतंत्र इमारतीमध्ये असणे आवश्यक आहे. सदरहू शाळेमध्ये विद्यार्थी व विद्यार्थीनींसाठी निवासाची व्यवस्था स्वतंत्र इमारतीमध्ये नसल्यास तशी व्यवस्था विहित कालावधीत करण्याची जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.

३) संदर्भाधिन शासन निर्णय, दिनांक ४/९/२०१९ मधील प्रपत्र-अ (२) (१) वसतिगृहविषयक अनिवार्य निकषामधील अ.क्र. १ प्रमाणे, संबंधित शाळेमध्ये विद्यार्थी व विद्यार्थीनींसाठी निवासाची व्यवस्था स्वतंत्र इमारतीमध्ये असणे आवश्यक आहे. विद्यार्थी व विद्यार्थीनींसाठी निवासाची व्यवस्था स्वतंत्र इमारतीमध्ये नसल्यास तशी व्यवस्था विहित कालावधीत करण्याची जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.

४) नामांकित निवासी शाळा योजनेच्या अनुषंगाने शाळेची तपासणी करावी तसेच शाळेत प्रवेशित सर्व विदयार्थ्यांचे आधारकार्ड पडताळणी करुन नोंदणी करावी. तद्नंतर प्रत्यक्ष उपस्थित लाभार्थी विदयार्थ्यांची संख्या व प्रत्यक्ष निवासी विदयार्थी संख्या याची खातरजमा करुन शासन निर्णय, दि.०४/०९/२०१९ व शासन निर्णय, दि.५/४/२०२४ मधील अटी-शर्तीनुसार सविस्तर अहवाल प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग यांच्या मान्यतेने निधी वितरणासाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे मार्फत शासनास सादर करावा.

५) सदर योजनेंतर्गत विद्यार्थी मंजूरीबाबत संबंधित संस्था/शाळा मार्फत शासनास सादर प्रस्तावात नमूद सर्व सोयी सुविधा देण्यास संस्था तयार आहे, याची संबधित सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी खातरजमा करावी व संस्थेसोबत तसा करारनामा करण्यात यावा.

६) संस्था/शाळेमार्फत भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांसाठी वेगळी तुकडी/वर्ग सुरु करणे अपेक्षित नाही, शाळेमध्ये सुरु असलेल्या नियमित तुकडी/वर्गामध्येच इतर विद्यार्थ्यांसमवेत योजनेंतर्गत प्रवेशित विद्यार्थ्यांना शिक्षण देणे बंधनकारक राहील.विद्यार्थ्यांसाठी वेगळी तुकडी/वर्ग सुरु केल्याचे आढळल्यास सदर संस्थेवर गुन्हा नोंदविण्याची कारवाई करण्यात येईल व शाळेची मान्यता तात्काळ रद्द करण्यात यईल.

७) संस्थेतील प्रवेशित मुलींच्या वसतिगृहात महिला अधिक्षिका व केअर टेकर यांची नियुक्ती करणे बंधनकारक आहे. याची पूर्तता न झाल्याचे आढळल्यास शाळेची मान्यता रद्द करण्यात येईल.

८) सदर योजनेंतर्गत शासनाने मान्यता दिलेल्या शाळांमध्येच आणि संबंधित शाळेकरिता मंजूर केलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेतच भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थी प्रवेशित करण्याबाबत संबंधित जिल्हयाचे सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी दक्षता घ्यावी.

९) योजनेच्या मूळ तरतुदीनुसार,कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रुपये १.०० लक्ष एवढया कमाल मर्यादेत असणाऱ्या पाल्यांनाच सदर योजनेचा लाभ देण्यात यावा.

१०) संबंधित जिल्हयाचे सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी विद्यार्थी प्रवेशित करताना जवळच्या शाळेमध्ये तसेच संबंधित प्रकल्पातील निवड करण्यात आलेल्या शाळांना प्राधान्य देऊन विद्यार्थी प्रवेशाची प्रक्रिया तात्काळ पूर्ण करावी.

११) एखाद्या प्रकल्प कार्यक्षेत्रातील निवड करण्यात आलेल्या शाळा व त्यामध्ये मंजूर विद्यार्थी संख्या यापेक्षा योजनेंतर्गत प्रवेशाकरिता प्राप्त अर्जांची संख्या जास्त असल्यास संबंधित जिल्हयाचे सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी विद्यार्थ्यांची निवड ड्रॉ पध्दतीने करुन निवड यादी जाहीर करावी. तसेच निवड न झालेल्या विद्यार्थ्यांची यादी प्रसिध्द करावी. प्रकल्पामधील निवड करण्यात आलेल्या शाळेमध्ये या विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात यावा.

(१०) सदर योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांच्या संस्थाचालक/मुख्याध्यापक यांच्या समवेत संबंधित जिल्हयाचे सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी शैक्षणिक वर्षाच्या प्रथम व द्वितीय सत्रामध्ये बैठक घेऊन प्रवेशित विद्यार्थ्यांची शैक्षणिक प्रगती व त्यांना पुरविण्यात येणाऱ्या सुविधांबाबत आढावा घ्यावा.

(११) नामांकित योजनेंतर्गत शाळेची निवड झाल्यानंतर पहिल्या सत्रात दोन वेळा, तसेच द्वितीय सत्रात दोन वेळा संबंधित जिल्हयाचे सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी अचानक नामांकित शाळांना

व्यक्तीशः भेट देऊन सदर शाळेमधील सौदार्हपुर्ण वातावरण, विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या सुविधा, औषधोपचार, शैक्षणिक दर्जा, पोषण इत्यादी सर्व बाबींबाबतचा अहवाल संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

(१२) संदर्भाधिन, शासन निर्णय दिनांक ४/९/२०१९ व शासन निर्णय, दि.५/३/२०२४ मधील विहित तरतुदींचे काटेकोरपणे पालन करावे. सदर तरतुदींचे पालन न करणाऱ्या शाळांची मान्यता रद्द करण्यात येईल.

(१३)नवीन विद्यार्थ्यांना इयत्ता १ ली ते ८ वी या इयत्तेमध्ये विहित अटींच्या अधिन राहून प्रवेश देण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

(१४)सदर शासन निर्णयानुसार नामांकित योजनेंतर्गत मान्यता रद्द करण्यात आलेल्या शाळांमधील विद्यार्थी तसेच शासकीय इंग्रजी माध्यमाच्या श्रेणी वाढ नसलेल्या शाळांमधील विद्यार्थी तसेच शासकीय इंग्रजी माध्यमाच्या श्रेणीवाढ नसलेल्या शाळांमधील विद्यार्थ्यांना इतरत्र समायोजित करण्यात यावे,असे समायोजन संबंधित जिल्हयाचे सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी करावे व संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांच्यामार्फत अहवाल शासनास सादर करावा.

(१५)नामांकित योजनेंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या नामांकित शाळेमध्ये विद्यार्थी प्रवेशित करताना ज्या इयत्तेत विद्यार्थी प्रवेशित करावयाचे आहेत. अशा इयत्तेत संबंधित शाळेमध्ये नामांकित योजने व्यतिरिक्त प्रवेशित इतर विद्यार्थीसंख्येच्या समप्रमाणाच्या कमाल मर्यादेत राहतील याची दक्षता घेण्यात यावी. (नामांकित योजनेंतर्गत प्रवेशित विद्यार्थी कमाल ५० टक्के योजने व्यतिरिक्त प्रवेशित इतर विद्यार्थी किमान ५० टक्के)

२. ज्या नामांकित संस्थेत भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यास प्रवेश देण्यात येणार आहे, त्या संस्थेबरोबर संबंधित सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी करारनामा करावा. सदर करारामध्ये नामांकित योजनेंतर्गत भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात आलेल्या वर्गापासून इयत्ता १२ वी पर्यंत त्यांचे शिक्षण, निवास,सुरक्षा,आरोग्य, आहार व अन्य विहित सोयी सुविधा पुरविण्याबाबत व स्वतंत्र वर्ग न करण्याबाबत बाबींचा समावेश करण्यात यावा. तसेच नामांकित योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या सर्व नामांकित शाळांचे प्रत्येक वर्षी नवीन शैक्षणिक वर्ष सुरु होण्यापूर्वी योजनेकरिता विकसित करण्यात येणाऱ्या ऑनलाईन प्रणालीवर गुणांकन करण्यात येईल व आवश्यक विहित शैक्षणिक व निवासी सोयी सुविधा यामध्ये निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांमध्ये त्रुटी आढळून आल्यास किंवा विहित गुणांकनानुसार शाळा "अपात्र" ठरल्यास संबंधित शाळेची नामांकित योजनेंतर्गतची मान्यता रद्द करुन प्रवेशित करण्यात आलेल्या भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थी इतरत्र समायोजित करण्यात येतील. याचा देखील करारनाम्यात समावेश असावा.

३. नामांकित योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शाळांमार्फत बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा अधिकार, अधिनियम, २००९ व त्यांअंतर्गत केलेले व केले जाणारे सर्व नियमांची / तरतुदींची तसेच इयत्ता १ ली मध्ये शाळा प्रवेशासाठी बालकाच्या किमान वयाबाबत शिक्षण विभागाने निश्चित केलेल्या तरतुदींचे पालन करणे आवश्यक आहे.

४. सदर योजनेची अंमलबजावणी संबंधित जिल्हयाचे सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण करतील तसेच प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग या योजनेचे"पर्यवेक्षकीय अधिकारी" म्हणून व संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे हे "नियंत्रक अधिकारी" म्हणून जबाबदारी पार पाडतील.

५. सदर योजनेसाठी होणारा खर्च "मागणी क्र. झेडजी-३,२२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण (२) (२२) धनगर समाजातील विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमांच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे (कार्यक्रम) ३४, शिष्यवृत्त्या/ विद्यावेतने, (२२२५एफ४०५)' या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या आर्थिक अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१३१७१९०७३४३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRINATH VASANT HENDRE

Digitally signed by SHRINATH VASANT HENDRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=b3272ba57bff80f4bbbb05e48f604bf4384ded9504494a9a7b08ac55e72f5cf8,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=AE1F9FC513D75E7EE10DDEA796B68C7E42CCD6D1F044CC779FFE2F5CA6313BD2, cn=SHRINATH VASANT HENDRE
Date: 2024.08.13 17:33:24 +05'30'

**( श्रीनाथ व. हेंद्रे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे स्वीय सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) प्रादेशिक उपसंचालक,इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशीक विभाग) विभाग, छत्रपती संभाजीनगर
५) जिल्हाधिकारी, परभणी
६) सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, परभणी
७) मा.महालेखापाल १/२,(लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी
९) अध्यक्ष, बाळकृष्ण सेवाभावी संस्था, वाडी तुळजापूर, ता. वसमत जि. हिंगोली
10) निवडनस्ती (योजना-२)